मे.पवनहंस लि., मुंबई यांच्याकडून भाडे तत्वावर घेण्यात आलेल्या हेलिकॉप्टरचे Fixed Monthly Charges, Flying Hourly Charges आणि Extra Flying Hours ची रक्कम अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक- एनएएक्स- ०७२०/प्र.क्र.१०४/विशा- १ ब,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक- २४ फेब्रुवारी, २०२२.

**वाचा :-**

१. अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.- पोमसं/२१-अ/ १९५/ हेलिकॉप्टर/१४४/२०१७ दि. २/१२/२०२१.
२. अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.- पोमसं/२१-अ/१९५/ हेलिकॉप्टर/१४४/२०१७ दि. २८/१२/२०२१.
३. अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.- पोमसं/२१-अ/ १९५/ हेलिकॉप्टर/१४४/२०१७ दि. १४/१/२०२२.

**प्रस्तावना :-**

नक्षलग्रस्त भागात पोलीस दलाचे बळकटीकरण करणे, जखमी व्यक्ती व जवानांची ने-आण करणे, त्यांना त्वरीत वैद्यकीय सहाय्य तसेच खाद्यसामुग्री पुरविणे, संशयित भागाची पाहणी करणे इत्यादी कामांकरिता मे. पवनहंस लिमि., मुंबई यांच्याकडून हेलिकॉप्टर भाडेतत्त्वावर घेण्याबाबत करार करण्यात आला आहे. सदर हेलिकॉप्टरचे माहे जून ते ऑक्टोबर, २०२१ चे Fixed Monthly Charges, Flying Hourly Charges आणि Extra Flying Hours चे देयक (ATF Charges चे Credit Invoice ची रक्कम वजा करुन) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई/पोलीस अधीक्षक, गडचिरोली यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नक्षलविरोधी अभियानाकरीता गडचिरोली येथे मे. पवनहंस लिमि., मुंबई यांच्याकडून भाडेतत्वावर घेण्यात आलेल्या हेलीकॉप्टरचे माहे जून ते ऑक्टोबर, २०२१ चे Fixed Monthly Charges, Flying Hourly Charges आणि Extra Flying Hours चे देयक (ATF Charges चे Credit Invoice ची रक्कम वजा करुन) रु. ६,७८,८७,३७८/- (अक्षरी रुपये सहा कोटी अठ्ठ्याहत्तर लक्ष सत्त्याऐंशी हजार तीनशे अठ्ठ्याहत्तर फक्त) एवढी रक्कम अदा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी दि. ३१/३/२०२२ पूर्वी खर्च करण्याची जबाबदारी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई/पोलीस अधीक्षक, गडचिरोली यांची राहील.

२. यासाठीचा खर्च मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस (००) १०९ जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल (२०५५ ०१६८) ५१ मोटार वाहने" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा. सदरहू निधी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ६/४/२०२१ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्ती नुसार खर्च करण्यास परवानगी देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२२४११५५४३०६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Dagadu Khedekar

Digitally signed by Sanjay Dagadu Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a53701d2758331055dd3c46d615f8367912b1c64cd218e709c1b4de20bdf4f85, cn=Sanjay Dagadu Khedekar
Date: 2022.02.24 12:00:24 +05'30'

**( संजय खेडेकर )**

उप सचिव, गृह विभाग.

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३) विशेष पोलीस महानिरीक्षक, नक्षल विरोधी अभियान, नागपूर

४) पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, गडचिरोली.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.

६) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.

७) जिल्हाधिकारी, गडचिरोली.

८) पोलीस अधीक्षक, गडचिरोली.

९) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.

१०) वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.

११) कार्यासन अर्थ-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) निवडनस्ती (वि.शा.- १ ब).